**कंत्राटदारांच्या नोंदणीचे सुधारित नियम**
**दि.२० एप्रिल, १९९८ च्या शासन निर्णयामधील**
**सुधारणा/बदलांबाबत.**

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांक सीएटी १०९६/प्र.क्र.१७२/इमारती २
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ११ फेब्रुवारी, २००२.

**प्रस्तावना**

शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.सीएटी १०९६/प्र.क्र.१७२/ इमारती २, दिनांक २० एप्रिल, ९८ अन्वये कंत्राटदारांच्या नोंदणीचे सुधारित नियम निर्गमित करण्यांत आलेले आहेत. सदरहू शासन निर्णयामधील काही तरतुदींमध्ये शासन परिपत्रक क्र. सीएटी १०९६/प्र.क्र.१७२/इमारती २, दिनांक २१ सप्टेंबर,२००० अन्वये काही बदल/सुधारणा करण्यात आल्या आहेत. तसेच शासन परिपत्रक क्र. सीएटी १०९६/प्र.क्र. १७२/इमारती २, दिनांक ११ ऑक्टोबर,२००१ च्या शासन परिपत्रकान्वये दिनांक २१ सप्टेंबर, २००० पूर्वी किंवा त्यादरम्यान नोंदणी झालेले कंत्राटदार व दिनांक २१ सप्टेंबर, २००० नंतर २१ सप्टेंबर, २००० च्या शासन परिपत्रकातील निकषानुसार नोंदणी झालेले ठेकेदार यांना सम पातळीवर आणण्यासाठी, दिनांक २१ सप्टेंबर,२००० च्या परिपत्रकातील अटी व निकषानुसार नोंदणी/नुतनीकरण न झालेल्या वर्ग १ ते वर्ग ५ मधील कंत्राटदारांनी नोंदणीचे नुतनीकरण संक्षम अधिकाऱ्यांकडून करुन घेणेबाबतचे आदेश देण्यात आले आहेत. तसेच शासन परिपत्रक क्र. सीएटी ०९/०१/सीआर ४०९/ इमारती २, दिनांक ११ ऑक्टोबर, २००१ अन्वये कंत्राटदारांच्या नोंदणीच्या प्रस्तावासोबतच्या कागदपत्रांची छाननी/पडताळणी /खातरजमा करणेबाबत सूचना देण्यांत आलेल्या आहेत. **वरील तिन्ही शासन परिपत्रकांचे एकत्रिकरण करुन कंत्राटदार नोंदणीबाबतच्या दिनांक २० एप्रिल, १९९८ च्या शासन निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा/बदल करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे :-**

**शासन निर्णय** :-

१.० **कंत्राटदारांच्या नोंदणीचे वर्गीकरण** :- अमर्यादित रकमेची कामे घेण्याची क्षमता असलेल्या कंत्राटदारांना वर्ग १ मध्ये नोंदणी देण्यात येते. कंत्राटदारांच्या क्षमतेनुसार वर्ग १ मधील नोंदणीसाठी खालीलप्रमाणे उपवर्गीकरण करण्यात यावे-

| उपवर्ग | कामाच्या रकमेची मर्यादा |
|---|---|
| वर्ग १ अ | रु. २५.०० कोटीपेक्षा अधिक (अमर्याद) |
| वर्ग १ ब | रु. १५.०० कोटीपेक्षा अधिक ते रु. २५ कोटी |
| वर्ग १ क | रु. ७.५० कोटीपेक्षा अधिक ते रु.१५ कोटी |

१.१ कंत्राटदारांनी सादर केलेल्या अद्ययावत आयकर निपटारा प्रमाणपत्रातील गेल्या तीन ते पाच वर्षातील किमान/लघुत्तम उलाढालीच्या ४.५ पट किंवा कमाल/ महत्तम उलाढालीच्या ३ पट यापैकी जी अधिक असेल ती रक्कम वर्ग १ मधील उपवर्गीकरणासाठी विचारात घेण्यात यावी.

२. **परिच्छेद क्र. २ (ब) (४)** :- कंत्राटदाराने पार पाडलेल्या/हाती असलेल्या खाजगी कामांच्या बाबतीत अनुज्ञप्तीधारक वास्तुशास्त्रज्ञांनी/चार्टर्ड इंजिनियर ह्यांनी प्रमाणित केले असेल तरच या खाजगी कामांच्या अंदाजित खर्चाच्या ५० टक्के एवढी रक्कम उलाढालीसाठी तथा हाती असलेल्या कामांसाठी विचारात घेण्यात यावी.

३. **परिच्छेद क्र.१ (अ) (iii)** - **वर्ग १ ते वर्ग ५मधील कंत्राटदार नोंदणीसाठी संबंधित कंत्राटदारांकडे, सोबतच्या परिशिष्टामध्ये विहीत करण्यांत आलेल्या यंत्रसामुग्रीच्या गटांपैकी किमान कोणत्याही एका गटातील संपूर्ण यंत्रसामुग्री** स्वतःच्या मालकीची असणे अनिवार्य आहे. त्याचप्रमाणे अशा यंत्रसामुग्रीच्या मालकीबाबत निर्विवाद व निःसंदिग्ध पुरावा प्रस्तावासोबत सादर करणेही आवश्यक आहे.

४. शासन परिपत्रक क्र. सीएटी १०९६/प्र.क्र. १७२/इमारती २, दिनांक ११ ऑक्टोबर,२००१ अन्वये ज्या कंत्राटदारांनी दिनांक २१ सप्टेंबर,२००० पूर्वी किंवा त्यादरम्यान दिनांक २० एप्रिल,१९९८ च्या शासन निर्णयाप्रमाणे नोंदणी/नुतनीकरण करुन घेतले आहे, अशा वर्ग १ ते ५ मधील नोंदणीकृत कंत्राटदारांनी दिनांक २१ सप्टेंबर,२००० च्या शासन परिपत्रकातील अटी व निकषांनुसार योग्य त्या वर्गात/उपवर्गात नुतनीकरण दिनांक ३१ डिसेंबर,२००१ पूर्वी सक्षम अधिकाऱ्यांकडून प्राप्त करुन घ्यावे असे आदेश देण्यात आले होते. तद्नंतर ही मुदत दिनांक २८ फेब्रुवारी, २००२ पर्यंत वाढविण्यांत आली आहे. **आता सदरील मुदत ही दिनांक ३१ मे, २००२ पर्यंत वाढविण्यांत येत आहे.**

५. कंत्राटदारांच्या वर्ग १ अ ते वर्ग ९ ह्या वर्गातील नोंदणी प्रस्तावासोबतच्या कागदपत्रांची छाननी/पडताळणी/ खातरजमा करणेबाबत पुढीलप्रमाणे कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी :-

१) कंत्राटदाराने कार्यकारी अभियंत्याकडे नोंदणीसाठी प्रस्ताव दाखल केल्यानंतर प्रस्तावासोबत सादर केलेल्या प्रमाणपत्राच्या/कागदपत्राच्या सत्यतेबाबतची खातरजमा कार्यकारी अभियंता यांनी ज्या कार्यालयाने/प्राधिकरणाने अशी प्रमाणपत्रे/कागदपत्रे दिली आहेत, त्या कार्यालयांकडे संपर्क साधून करावी.

२) कंत्राटदारांनी सादर केलेल्या प्रस्तावातील मूळ प्रमाणपत्रांच्या/कागदपत्रांच्या सत्यतेबाबत खातरजमा केल्यानंतर नोंदणी प्रस्तावासोबत शासनास सादर करावयाच्या विविध प्रमाणपत्रांच्या/कागदपत्रांच्या सत्य प्रती ज्या विभागाकडून प्रस्ताव सादर करण्यात येतो, त्या विभागाच्या कार्यकारी अभियंता/उप कार्यकारी अभियंता/विभागीय लेखा अधिकारी/विभागीय लेखापाल यांनी त्यांचे स्वाक्षरीनेच साक्षांकित कराव्यात. अन्यथा प्रस्ताव विचारात घेतला जाणार नाही.

३) कंत्राटदाराने खाजगी कामे केल्याबाबतची प्रमाणपत्रे प्रस्तावासोबत सादर केली असल्यास,सदर कामे त्या कंत्राटदारानेच केली आहेत याची शहानिशा संबंधित कार्यकारी अभियंता यांनी करावी. तसेच केलेल्या कामाच्या किंमतीबाबत खातरजमा करावी.

४) काही प्रकरणी साखर कारखाना/सूत गिरणी यांच्या कामाचे दाखले सादर करण्यात येतात. अशा प्रकरणी साखर आयुक्त/संचालक हातमाग, यंत्रमाग व वस्त्रोद्योग, नागपूर यांचेकडून किंवा त्यांचे कार्यालयातील सक्षम अधिकाऱ्यांकडून सदरील कामाचे दाखले प्रतिस्वाक्षरीत असणे आवश्यक आहे.

५) सक्षम अधिकाऱ्यांकडे नोंदणी प्रस्ताव मंजुरीसाठी सादर करावयाच्या प्रस्तावासोबत **"प्रमाणित करण्यात येते की, मे./श्री. ---------------------------या वर्ग ------- मधील कंत्राटदार नोंदणीच्या प्रस्तावात असलेल्या सर्व कागदपत्रांच्या/ प्रमाणपत्रांच्या सत्यतेबाबत संबंधित कार्यालयांशी संपर्क साधून खातरजमा करणेत आली आहे" असे प्रमाणपत्र कार्यकारी अभियंता यांनी देणे अनिवार्य आहे.**

६. कार्यकारी अभियंता यांनी कंत्राटदार नोंदणीबाबतच्या प्रस्तावाची सखोल छाननी करुन वर नमूद केल्याप्रमाणे प्रस्तावातील विविध प्रमाणपत्रांच्या सत्यतेबाबतची खातरजमा करुनच आवश्यक अटींची/निकषांची पूर्तता होत आहे असेच प्रस्ताव सक्षम अधिकाऱ्यांकडे मंजूरीसाठी सादर करावेत.

७. कार्यकारी अभियंत्यांकडून प्राप्त झालेल्या कंत्राटदार नोंदणी प्रस्तावातील **प्रमाणपत्रे खोटी असल्याचे नंतर निदर्शनास आल्यास संबंधित कंत्राटदाराची नोंदणी रद्द करणेत येईल व त्यांचेविरुध्द कायदेशीर कारवाई करणेत येईल. तसेच प्रस्तावातील कागदपत्रांची छाननी/पडताळणी/खातरजमा करणेबाबतची दक्षता न घेतल्याबाबत ज्या**

**कार्यालयातून सदर प्रस्ताव सादर करणेत येईल त्या कार्यकारी अभियंत्यांवर व त्या कार्यालयातील इतर संबंधितांवर कारवाई करणेत येईल.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(शि. वि. तामखडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

मा. मुख्यमंत्री ह्यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री (सा.बां.)/पाटबंधारे ह्यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (सा.बां.)/पाटबंधारे ह्यांचे खाजगी सचिव,
वित्त विभाग/सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
महालेखापाल-१, मुंबई/महालेखापाल-२, नागपूर,
सचिव (रस्ते)/सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, ह्यांचे स्वीय सहाय्यक,
पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,

प्रत माहितीसाठी व आवश्यक कार्यवाहीसाठी

सर्व मुख्य अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग,
मुख्य अभियंता, बृहन्मुंबई क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई, महाराष्ट्र,
गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (म्हाडा), मुंबई, महाराष्ट्र,
औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ, (सिडको), निर्मल बिल्डींग, नरीमन पॉइंट, मुंबई/महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,
मुंबई, पाटबंधारे विकास महामंडळ, कृष्णा/तापी/गोदावरी/विदर्भ, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई,
आयुक्त, सर्व महानगरपालिका (२ प्रतींसह),
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषदा,
अधीक्षक अभियंता व प्रादेशिक अधिकारी, भूपृष्ठ वाहतूक मंत्रालय, मुंबई,
सर्व अधीक्षक अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग,
अधीक्षक अभियंता, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ,वरळी, मुंबई/ महानगर पालिका, ठाणे/पुणे/कल्याण
संचालक, उपवने आणि उद्याने, मुंबई,
प्रतिनियुक्तीवरील सर्व अधिकारी,
सर्व कार्यकारी अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग/जिल्हा परिषद,
सर्व अधिकारी/कार्यासन अधिकारी,सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
कार्यासन इमारती-२, (निवड नस्ती)

## परिशिष्ट

कंत्राटदारांकडे किमान खालीलपैकी कोणत्याही एका गटातील संपूर्ण यंत्रसामुग्री स्वत:च्या मालकीची असणे आवश्यक आहे.

| यंत्रसामुग्रीचा तपशील | वर्ग १अ/१ब/१क/वर्ग२/वर्ग ३ | वर्ग ४/४अ | वर्ग ५ |
|---|---|---|---|
| **गट-१** | | | |
| ट्रक्स/टिप्पर्स/ ट्रॅकर ट्रॉली | ४ | ३ | २ |
| कॉंक्रीट मिक्सर | ३ | २ | १ |
| व्हायब्रेटर | ३ | २ | १ |
| ५ हॉर्स पॉवरचे पंप | २ | १ | १ |
| सेंटरींगचे साहित्य | ५०० चौ.मि. | ३०० चौ.मि. | १०० चौ.मि. |
| मेकॅनिकल हॉइस्ट | १ संच | | |
| **गट-२** | | | |
| ट्रक्स/टिप्पर्स/ ट्रॅक्टर ट्रॉली | १० | ६ | २ |
| एक्सकॅवेटर | २ | १ | |
| रोड रोलर (डीआरआर) | २ | १ | १ |
| व्हायब्रेटरी रोलर | १ | | |
| वॉटर टॅंकर | २ | १ | १ |
| एअर कॉंप्रेसर | २ | १ | |
| कॉंक्रीट मिक्सर | २ | १ | १ |
| व्हायब्रेटर | २ | १ | १ |
| **गट -३** | | | |
| ट्रक्स/टिप्पर्स/ट्रॅक्टर ट्रॉली | ६ | ३ | २ |
| रोड रोलर (डीआरआर) | २ | १ | १ |
| व्हायब्रेटरी रोलर | १ | | |
| आस्फाल्ट मिक्सर व बॉयलर | १ | १ | १ |
| ड्रम मिक्स प्लांट | १ | | |
| सेन्सॉर पेव्हर फिनिशर | १ | | |
| मेकॅनिकल आस्फाल्ट स्प्रेयर | १ | | |
| कॉंक्रीट मिक्सर | १ | १ | १ |
| व्हायब्रेटर | १ | १ | १ |